**खरीप हंगाम - २०२० पूर्वी शेतकऱ्यांना आवश्यक बाबींच्या खरेदीसाठी / पायाभूत सुविधांच्या उभारणीसाठी अर्थसहाय्य करण्याच्या दृष्टीने कृषि विभागाच्या योजनांची अंमलबजावणी तातडीने सुरु करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.२२/२-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२,

दिनांक :- १४ फेब्रुवारी, २०२०

**संदर्भ:** कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. ०४१८/प्र.क्र. ११५/१४ अे, दिनांक २७/०४/२०१८

**प्रस्तावना :**

कृषि विभागामार्फत विविध केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांची तसेच, जागतिक बँक सहाय्यित प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यात येते. या योजना व प्रकल्पांच्या माध्यमातून राज्यातील शेतकरी बांधवाना शेतीसाठी आवश्यक असलेल्या विविध बाबींच्या खरेदीसाठी तसेच, शेतावर विविध पायाभूत सुविधांच्या उभारणीसाठी अर्थसहाय्य करण्यात येते. या मध्ये प्रामुख्याने बियाणे, यंत्र व औजारे, ठिबक / तुषार संच इ.ची खरेदी तसेच, शेत तळे खोदकाम, शेत तळ्यास प्लास्टिक अस्तरीकरण, कांदाचाळ, शेड नेट / हरितगृह उभारणी, फळबाग लागवड नियोजन इ. बाबींचा समावेश आहे.

आगामी खरीप हंगाम लक्षात घेता, खरीप हंगामापूर्वी शेतकऱ्यांना आपल्या शेताकरिता आवश्यक असलेल्या बाबींच्या खरेदीसाठी / उभारणीसाठी कृषि विभागाच्या विविध योजनांचा लाभ मिळवून देण्याकामी शेतकऱ्यांचे अर्ज मागवून लाभार्थ्यांची निवड करून त्यांना मंजुरी देण्याची कार्यवाही तातडीने करण्याच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे शासन परिपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

**परिपत्रक** :

१. कृषि विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या सर्व केंद्र व राज्य पुरस्कृत योजना तसेच, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पासाठी सन २०१९-२० मध्ये जेवढी आर्थिक तरतूद उपलब्ध करुन दिली होती साधारणतः तेवढीच तरतूद सन २०२०-२१ करिता उपलब्ध होईल असे गृहीत धरून सर्व योजना / प्रकल्पांतर्गत लाभार्थ्यांची निवड करण्याकरिता तत्काळ जाहिरात प्रसिद्ध करण्यात याव्यात व इच्छुक शेतकऱ्यांकडून अर्ज मागवून लाभार्थी निवड प्रक्रिया तातडीने सुरु करावी.

२. कृषि आयुक्तालयाने जिल्हा / तालुका निहाय अस्थायी स्वरूपात आर्थिक लक्षांक निश्चित करून द्यावेत आणि सन २०२०-२१ साठी केंद्र / राज्य योजनांचे वार्षिक कृति आराखडे अंतिम झाल्यानंतर सुधारित जिल्हा / तालुका निहाय आर्थिक लक्षांक निश्चित करण्यात यावेत.

३. सन २०१८-१९ मध्ये “उन्नत शेती - समृद्ध शेतकरी” अभियानांतर्गत संदर्भांकित शासन निर्णयाद्वारे विहित केलेल्या प्रक्रियेनुसार शेतकऱ्यांकडून प्राप्त होणाऱ्या अर्जातून सोडत पद्धतीने तालुका निहाय लाभार्थ्यांची तातडीने निवड करण्यात यावी. त्याचप्रमाणे, योजनेंतर्गत निधीचे संबंधित जिल्ह्यास / तालुक्यास वितरण होण्याची वाट न पाहता लाभार्थ्यांना तातडीने पूर्व संमती आदेश निर्गमित करावेत.

४. सन २०१९-२० मध्ये, निधी अभावी विविध योजनांतर्गत ज्या शेतकऱ्यांच्या अर्जांना मंजुरी देऊन लाभ देणे शक्य झाले नाही असे जुने अर्ज सन २०२०-२१ या वर्षात सोडत काढतेवेळी विचारात घ्यावेत, या शेतकऱ्यांना पुनःश्च अर्ज करण्याची आवश्यकता राहणार नाही. अशाप्रकारे, सन २०२०-२१ मध्ये प्राप्त होणारे नवीन अर्ज व सन २०१९-२० मधील शिल्लक जुने अर्ज एकत्र करुन त्यांची सोडत काढावी व लाभार्थ्यांची सन २०२०-२१ करिता निवड करण्यात यावी.

५. मागील काही वर्षात शेतकऱ्यांच्या अर्जांना पूर्व-संमती दिल्यानंतर शेतकऱ्यांच्या गळतीचे प्रमाण लक्षात घेता, प्रत्येक योजनेकरिता जिल्हा / तालुका निहाय प्राप्त होणाऱ्या एकूण आर्थिक लक्षांकाच्या दिड पट अर्जांना पूर्व-संमती देण्यात यावी.

६. फळबाग लागवडीच्या योजनेंतर्गत शेतकऱ्यांना खड्डे घेऊन फळबाग लागवडीचे नियोजन करण्याच्या दृष्टीने लाभार्थ्यांना दि. १५ एप्रिल, २०२० पूर्वी पूर्व-संमती आदेश निर्गमित करावेत.

७. सन २०१९-२० मध्ये कृषि विभागाच्या विविध योजनांच्या अंमलबजावणीसाठी सविस्तर मार्गदर्शक सूचना कृषि आयुक्तालयामार्फत निर्गमित केलेल्या आहेत. सबब, सन २०२०-२१ मध्ये पुनःश्च नव्याने मार्गदर्शक सूचना निर्गमित न करता, सन २०१९-२० मध्ये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांमध्ये जो बदल करावयचा असेल केवळ तेवढा बदल क्षेत्रीय कार्यालयांना कळविला जाईल याची सर्व कृषि संचालकांनी व आयुक्त (कृषि) यांनी दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेताक २०२००२१४१४५४५५८४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c,
serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.02.14 14:56:11 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२

२. मा. मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

३. मा. राज्य मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

४. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

६. सर्व सह सचिव / उप सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

७. कृषि संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे,

८. विभागीय कृषि सह संचालक (सर्व)

९. सर्व अवर सचिव / कार्यासन अधिकारी, कृषि व, पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई.

१०.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)

११.महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

१२.महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.